मराठी भाषेतील चित्रपट/ दूरदर्शन/ ओटीटी क्षेत्राच्या विकासासाठी ऑनलाईन पध्दतीने फिल्मबाजार पोर्टल तयार करणे व त्यासाठी समिती गठित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०२३/प्र.क्र.२१/सांका १,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २२ फेब्रुवारी, २०२३

वाचा: व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट,रंगभूमी, सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब फाळके चित्रनगरी, मुंबई यांचे क्रमांक दाफचि/फि.वा./२०२२/ ७१७, दिनांक २०/१२/२२ चे पत्र

**प्रस्तावना : -**

राष्ट्रीय तसेच आंतरराष्ट्रीय स्तरावरील चित्रपट महोत्सवात फिल्मबाजारचे आयोजन करण्यात येते. या फिल्मबाजारामध्ये प्रामुख्याने पटकथा लेखक, दिग्दर्शक, निर्माते यांना एकत्रित आणून चित्रपट निर्मितीच्या कामामध्ये सुलभता आणण्याचा प्रयत्न करण्यात येतो. तथापि, अशा प्रकारचे फिल्मबाजार वर्षातून ठराविक वेळी होत असतात व त्यामध्ये मराठी चित्रपटांशी संबंधित व्यक्ती / संस्था यांना प्रत्येक वेळी भाग घेणे शक्य होत नाही. मराठी चित्रपट सृष्टीला प्रोत्साहन देण्यासाठी संदर्भाधीन पत्राअन्वये ऑनलाईन पध्दतीने फिल्मबाजार पोर्टलद्वारे विकसित करण्याचा, सदर पोर्टलव्दारे काम करण्यासाठी चित्रपट क्षेत्रातील तज्ज्ञांसह समिती गठीत करण्याचा प्रस्ताव प्राप्त झाला आहे. यामुळे मराठी चित्रपटांशी संबंधित व्यक्ती/संस्थांना एकमेकांशी सहजरित्या संवाद साधता येईल व त्यामधून माफक दरात उच्च दर्जाची चित्रपट निर्मिती होण्यास मदत होईल. तसेच या व्यवस्थेचा लाभ दूरदर्शनवरील मराठी मालिका/कार्यक्रम/ ओटीटी (ओव्हर द टॉप) वरील मराठी मालिका/चित्रपट इत्यादीनांही होईल. राज्यालाही ठराविक विषयावरील चित्रपट निर्मितीसाठीही सदर समितीचे सहाय घेता येईल. त्याअनुषंगाने राज्यात चित्रपट महोत्सवातील फिल्म बाजारच्या धरतीवर मात्र ऑनलाईन पध्दतीने नियमितरित्या कार्यरत फिल्मबाजार पोर्टल विकसित करण्याचे व सदर पोर्टलच्या माध्यमातून काम करण्यासाठी समिती गठीत करण्याचे विचाराधीन होते.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र राज्यात मराठी चित्रपट/दूरदर्शनवरील मराठी मालिका/कार्यक्रम/ओटीटी वरील मराठी मालिका/चित्रपट याचा विकास ऑनलाईन पध्दतीने फिल्मबाजार पोर्टलद्वारे करण्याचा व सदर पोर्टलच्या माध्यमातून काम करण्यासाठी समिती गठीत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. सदर पोर्टल २४ /७ व ३६५ दिवस सुरु राहिल.

२. सदर फिल्मबाजार पोर्टलसंदर्भात पुढीलप्रमाणे समिती राहील-

१) व्यवस्थापकीय संचालक, दादासाहेब चित्र फाळके चित्रनगरी, मुंबई- अध्यक्ष
२) श्री स्वप्निल जोशी - सदस्य
३) श्री संदिप घुगे - सदस्य
४) श्री केतन मारू - सदस्य
५) श्री संजय जाधव - सदस्य
६) श्री महेश कोठारे - सदस्य

३. सदर समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील-

- मराठी चित्रपट, दूरदर्शनवरील विविध चॅनलच्या मराठी मालिका/कार्यक्रम आणि ओटीटीवरील मराठी चित्रपट/मालिका यांच्या निर्मितीकरीता पटकथा लेखक, निर्माते, दिग्दर्शक, कलाकार, तंत्रज्ञ आणि वित्त पुरवठादार इत्यादींना एका व्यासपीठावर (Platform) आणून एकमेकांशी समन्वय साधणे, त्यांना नियमितपणे सल्ला देणे/बिगर आर्थिक सहाय इ.बाबी करणे.
- राज्यातील स्वातंत्र्यसेनानी, इतर महत्त्वाचे समाजसुधारक, साहित्य, सांस्कृतिक क्षेत्रातील सन्माननीय व्यक्ती इ. च्या जीवनावर आधारीत चित्रपट/ दूरदर्शन मालिका/ वेब मालिका/ इत्यादी निर्मिती करण्यासाठी प्रयत्न करणे. शासनाला अशा प्रकल्पांसाठी आवश्यक सहकार्य व वेळोवेळी सल्ला देणे.
- मराठी निर्मात्यांना आर्थिक नुकसान झाल्यास त्यांनी सदर व्यवसाय चालु ठेवण्यासाठी बँकांकडून कमीत कमी दरात हमी मिळेल का याबाबत ही अभ्यास करणे.
- भौतिकरित्या होणाऱ्या फिल्मबाजार पध्दतीचा अभ्यास करुन ऑनलाईन पोर्टल तयार करण्याबाबतचा आराखडा शासनाच्या मान्यतेसाठी सादर करणे.
- यासाठी आवश्यकतेप्रमाणे मराठी चित्रपट क्षेत्राशी संबंधित व्यक्ती/संस्था यांच्याशी समन्वय करणे.
- पोर्टल तयार करण्यासाठी माहिती तंत्रज्ञान विकासक यांच्याशी वेळोवेळी समन्वय साधणे.

४. सदर समितीच्या बैठकीच्या वेळी समिती सदस्यांना आवश्यक असलेली यंत्रणा महाराष्ट्र चित्रपट,रंगभूमी, सांस्कृतिक विकास महामंडळाने उपलब्ध करुन द्यावी.

५. सदर समिती गठीत केल्यामुळे शासनावर कोणताही आर्थिक भार येणार नाही.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२३०२२२१०५५५४५८२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA HEMANT WAGHMARE

Digitally signed by VIDYA HEMANT WAGHMARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=4e214bf8a250420c28c2084d8dd965c0d454568322bd41981d48971712e51795, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F93EFE7B946BF26FF989D6E5E01E1B122B9EB4E3E4E6799CB8E82B2D33D58DFC, cn=VIDYA HEMANT WAGHMARE
Date: 2023.02.22 18:22:58 +05'30'

**( विद्या वाघमारे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहायक
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट,रंगभूमी, सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब चित्र फाळके चित्रनगरी, गोरेगाव, मुंबई
४. व्यवस्थापकीय संचालक, कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ, कोल्हापूर
५. सचिव, माहिती तंत्रज्ञान, सामान्य प्रशासन विभाग, मुंबई
६. वरील समिती सदस्य (व्यवस्थापकीय संचालक, चित्रपट,रंगभूमी, सांस्कृतिक महामंडळ, मुंबई मार्फत)
७. निवड नस्ती.